**विविध बँकामार्फत कर संकलन केलेल्या रकमेचा भरणा रिझर्व्ह बँकेकडे करताना नजरचुकीने झालेल्या अतिरिक्त रकमांच्या वा दुबार भरणा रकमांच्या परताव्याबाबतची कार्यपध्दती निश्चित करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांक - संकीर्ण १०.१३/प्र.क्र.१३३/अर्थोपाय**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०४ मार्च ,२०१५.

**शासन परिपत्रक -**

विक्रीकर विभागामार्फत अंमलबजावणी करण्यात येणा-या कायद्यांतर्गत करांचे संकलन विविध राष्ट्रीयकृत बँकामार्फत केले जाते. संकलित करांचा भरणा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे करत असताना नजरचुकीने काही वेळा राष्ट्रीयकृत बँकामार्फत अतिरिक्त रकमांचे प्रदान भारतीय रिझर्व्ह बँकेकडे होते. अशा रकमा परत करण्यासाठीचे प्रस्ताव राष्ट्रीयकृत बँकांकडून विक्रीकर आयुक्त कार्यालयाकडे प्राप्त होतात.

२. करापोटी जमा झालेल्या रक्कमेपेक्षा भारतीय रिझर्व्ह बँकेकडे जास्त रक्कम हस्तांतरीत झाली असेल तर ती परत करण्याचा विषय हा जमा कर व हस्तांतरीत रक्कम यांच्या मेळजुळणीशी संबंधित आहे. अशा अतिरिक्त रक्कमांच्या परताव्याबाबतची कार्यपध्दती पुढीलप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे.

अ) अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाने बँकांनी अतिरीक्त रकमांच्या परताव्याबाबत केलेल्या दाव्याच्या अनुषंगाने विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य यांचेकडून अभिप्राय घ्यावेत.

ब) विक्रीकर आयुक्त यांनी अतिरिक्त रकमा प्रदान झाल्या आहेत किंवा कसे या विषयीचे बँक स्क्रोल व विवरण तपासून अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयास त्यावर अभिप्राय द्यावेत.

क) विक्रीकर आयुक्त यांनी असे अभिप्राय देत असतांना विक्रीकर विभागाने कोणती तपासणी सूची (checklist)अवलंबावी या विषयाच्या सूचना अंतर्गत परिपत्रकान्वये संबंधितांना द्याव्यात.

ड) विक्रीकर आयुक्त यांनी दिलेल्या अभिप्रायांच्या आधारे अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाने बँकांना अतिरिक्त रक्कम अदा केली असेल तर त्यांना ती परत करावी.

एकावेळी रु.१.०० कोटी पर्यंत अतिरिक्त रक्कम अदा करणेबाबत विक्रीकर आयुक्त व अधिदान व लेखा कार्यालयाने वरील प्रमाणे कार्यवाही करावी. असे प्रस्ताव यापुढे शासनाकडे मान्यतेसाठी पाठविण्यात येऊ नयेत.

अतिरिक्त रक्कम रु.१.०० कोटी पेक्षा अधिक असल्यास, प्रथम अधिदान व लेखा अधिकारी कार्यालयाने विक्रीकर आयुक्त यांचे अभिप्राय घ्यावेत व त्यांनी अतिरीक्त रक्कम प्रदान करण्यास सहमती दर्शविल्यानंतर अधिदान व लेखा कार्यालयाने तसे शासनास कळवावे व शासन मान्यतेनंतर योग्य ते आदशे अधिदान व लेखा कार्यालयाने निर्गमित करावेत.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संगणक संकेतांक २०१५०३०४१५४९०८५३०५ असा आहे. हा आदेश डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Vasant Krishna Patil

Digitally signed by Vasant Krishna Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance Department, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Vasant Krishna Patil
Date: 2015.03.04 16:14:25 +05'30'

**(व.कृ.पाटील)**
उप सचिव, वित्त विभाग

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव(वित्त) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
२. प्रधान सचिव(व्यय) यांचे स्वीय सहायक
३. सचिव(ले.व को.) यांचे स्वीय सहायक
४. महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई
५. महालेखापाल-१ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, मुंबई
६. महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर
७. महालेखापाल-२ (लेखा परीक्षा) महाराष्ट्र, नागपूर
८. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई
९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
१०.निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई
११.उप सचिव (कोषा-प्रशा.५), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१२.उप सचिव (कराधान), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१३.उप सचिव (विनियम), वित्त विभाग, मंत्रालय,मुंबई
१४.निवड नस्ती.